इतर मागास बहुजन कल्याण विभागातंर्गत वसतीगृह, पंडीत दिनदयाळ उपाध्याय स्वयंम व ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले आधार योजनांच्या अनुषंगाने एकीकृत पोर्टल विकसीत करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२४/प्र.क्र.५६५ (भाग-१)/योजना-१**
मोती महल, २ रा मजला,१९५, जे. टाटा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०२५.

**संदर्भ :-**
१) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.वगृयो-२०२०/प्र.क्र.०१/योजना-५, दिनांक २९.११.२०२२.
२) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.वगृयो-२०२०/प्र.क्र.०१/योजना-५, दिनांक २८.०२.२०२३.
३) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.वगृयो-२०२०/प्र.क्र.०१/योजना-५, दिनांक १९.१२.२०२३.
४) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.वगृयो-२०२२/प्र.क्र.११/योजना-५, दिनांक १३.१२.२०२३.
५) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.वगृयो-२०२२/प्र.क्र.११/योजना-५, दिनांक ११.०३.२०२४.
६) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.स्वयंम-२०२३/ प्र.क्र.३६८/ योजना-२, दिनांक २१.०४.२०२४.
७) विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीचे (PIC) दि.३०.०१.२०२५ रोजीचे इतिवृत्त.
८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र इन्फॉर्मेशन टेक्नोलॉजी कॉर्पोरेशन लि. यांचे दि.२६.०९.२०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

राज्यातील इतर मागास वर्ग, विमुक्त जाती व भटक्या जमाती आणि विशेष मागास प्रवर्गातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांकरीता संदर्भ क्र.१ अन्वये वसतीगृह योजना, संदर्भ क्र.४ अन्वये ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले आधार योजना व सदंर्भ क्र.६ अन्वये पंडीत दिनदयाळ उपाध्याय स्वयंम योजना, अशा विविध योजना सुरु करण्यात आल्या आहेत. सदरहू योजनांर्तगत विद्यार्थ्यांना अर्ज करण्याची प्रक्रिया सुलभ होणे, तसेच, विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या सुविधा अधिक परिणामकारक / पारदर्शक होण्याकरीता सदरहू योजनांकरीता पोर्टल विकसीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

त्यानुसार, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र इन्फॉर्मेशन टेक्नोलॉजी कॉर्पोरेशन प्रा.लि. यांनी संदर्भ क्र.५ येथील दि.२६.०९.२०२४ रोजीच्या पत्रान्वये एका एकीकृत पोर्टल अंतर्गत वसतिगृह

व्यवस्थापन प्रणाली, आधार आणि स्वयंम योजनांचा विकास आणि वार्षिक देखभाल करार (AMC) च्या अनुषंगाने सादर केलेल्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ मर्या. (Maharashtra Information Technology Corporation Ltd.-MahaIT) या महाराष्ट्र शासनाच्या उपक्रमाकडून राज्यातील इतर मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्ग या प्रवर्गातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी वसतीगृह योजना, पंडीत दिनदयाळ उपाध्याय स्वयंम योजना व ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले आधार योजनांचा विकास आणि वार्षिक देखभाल करार (AMC) च्या अनुषंगाने ऑनलाईन पोर्टल विकसित करुन घेण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. याकरीता रु.२९,६९,७१८.६५८ (रुपये एकोणतीस लक्ष एकोणसत्तर हजार सातशे एकोणीस फक्त) इतक्या अनावर्ती खर्चास (कर वगळून ) व तक्ता क्र.२ मध्ये नमुद बाबींच्या अनुषंगाने आवश्यक आवर्ती खर्चास (कर वगळून) मान्यता देण्यात येत आहे. खर्चाचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

**तक्ता क्र. १ (अनावर्ती खर्च)**

| Sr.No. | Description | Total Billable Amount (in Rs.) |
|---|---|---|
| A | Devlopment (One Time) | 22,82,647.50 |
| B | Security Audit (One Time) | 1,50,000 |
| C | UAT Cloud Hosting (One Time) | 2,91,865.03 |
| | **Total** | **27,24,512.53** |
| | MahaIT Administrative Charges (9%) | 2,45,206.127 |
| | **Total** | **29,69,718.658** |

**तक्ता क्र.२ (आवर्ती खर्च )**

| Sr.No. | Description |
|---|---|
| A | Production Cloud Hosting (Yearly Rs. 11,14,859.88) |
| B | MahaIT Administrative Charges (9%) (सदरचा खर्च Sr.No. A च्या 9% राहील.) (Yearly) |
| C | Help Desk Support (Monthly Rs. 36,354.62) |
| | VPN services, Network Line Charges & Helpline Number / EPBX Virtual Server (Monthly Rs.9,000 ) |

| | |
|---|---|
| D | Service Charges :-<br>Rs. 20/- for each Online Application submitted through Hostel Management System, Swayam & Aadhar Scheme portal and Rs. 5.50/- for each DBT fund transfer for who is eligible for Hostel Maintenance, Swayam and Aadhar. |

**(टीप:**-तक्ता क्र.२ येथे नमुद आवर्ती खर्च अंदाजीत असून यामध्ये आवश्यकतेनुसार वाढ/घट होऊ शकते.**)**

**०२.** याबाबतचा खर्च "मागणी क्र.झेडजी-२, २२५१- सचिवालय सामाजिक सेवा, (०१) ई-गव्हर्नन्स प्रकल्प राज्य योजना (०१) (०१) इ-शासन प्रकल्पाची अंमलबजावणी (कार्यक्रम) १७ , संगणक खर्च (२२५११३३४)" या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०२४-२५ करीता प्राप्त आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

**०३.** हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उप विभाग-दोन, अनुक्रमांक २७-अ, नियम क्र. ७६ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

**०४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२१४१५३३५५८०३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

MAHESH VAMAN SARANG

Digitally signed by MAHESH VAMAN SARANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=d0fd8a6eb797ea40ee23585844bb6560f906ef81c28159527 6444d546ca36145, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F69F7D02E8869F5B3A4C2B8A9895589FF307B9C66D E751750FC9831B49A017C0, cn=MAHESH VAMAN SARANG
Date: 2025.02.14 15:35:20 +05'30'

**(महेश सारंग)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. उप मुख्यमंत्री (वित्त) महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

९. मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास विभाग) महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. मा. मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव, (इतर मागास बहुजन कल्याण विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई/नागपूर.
१३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
१४. संचालक, एनआयसी (National Informatics Centre), मुंबई/पुणे.
१५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / नागपूर.
१७. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. कक्ष अधिकारी (संगणक कक्ष), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. कक्ष अधिकारी (योजना-२), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. वित्त विभाग (व्यय-५) / अर्थसंकल्प शाखा
२१. निवड नस्ती (योजना-१).